सराईत अपराधी व अपराधी परिविक्षा योजनेस, सन २०२४-२५ या अर्थसंकल्पीय वर्षातील माहे एप्रिल, २०२४ ते जुलै, २०२५ या कालावधीसाठी निधी वितरीत करण्याबाबत.

# महाराष्ट्र शासन

## महिला व बाल विकास विभाग

## शासन निर्णय क्र. अपअ-२०२४/ प्र.क्र.२२/का-९

नवीन प्रशासन भवन, ३ रा मजला,
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
दिनांक - २० जून, २०२४

वाचा -१. वित्त विभाग, शासन परिपत्रक क्र. अर्थसं-२०२४/प्र.क्र.३४/अर्थ-३, दि.१ एप्रिल, २०२४
२. आयुक्त, महिला व बाल विकास आयुक्तालय, पुणे यांचे पत्र क्र. मबाविआ/अपअ/अनुदान मागणी/२०२४-२५/का-७/२८३२, दि.२६/४/२०२४

**प्रस्तावना**

केंद्र शासनाचा १९५८ चा अधिनियम व महाराष्ट्र अपराधी परिविक्षा अधिनियम, १९५८ अंतर्गत ही योजना राबविण्यात येते. मा. न्यायालयाच्या आदेशानुसार मुक्त केलेले परिविक्षाधीन/मुक्तबंदी/ कारागृहातील शिक्षा भोगत असलेले बंदी यांनी शासनाकडे पुनर्वसनासाठी मागणी केल्यास त्यांना दि.१४/१०/२०१६ व दि.१३/६/२०१८ रोजीच्या शासन निर्णयानुसार रु.२५,०००/- पर्यंत सहायक अनुदान दिले जाते.

वित्त विभागाच्या संदर्भ क्र.१ येथे नमूद दि.१/४/२०२४ रोजीच्या परिपत्रकान्वये वित्तिय वर्ष २०२४-२५ करीता एप्रिल-२०२४ ते जुलै-२०२४ पर्यंतची मासिक विवरणपत्रे अर्थसंकल्पीय अंदाज, वाटप व संनियंत्रण प्रणालीवर (बीम्स) प्रशासकीय विभागांकडून नोंदविण्यात आल्यानंतर विभागास आवश्यक असणारा अनिवार्य व कार्यक्रमावरील खर्चाचा निधी (लेखानुदान) वितरीत करण्याबाबत सूचना निर्गमित करण्यात आलेल्या आहेत. तसेच निधी वितरीत करतांना मासिक निधी विवरणपत्रात (Cash Flow Statement) ज्या दरमहा खर्च रकमा दर्शविल्या आहेत त्याच्याशी सुसंगत असाव्यात असे सूचित करण्यात आले आहे.

सराईत अपराधी व अपराधी परिविक्षा योजनेस (२२३५-०११३) या लेखाशीर्षाखाली रु.४४.०० लक्ष इतका निधी अर्थसंकल्पित करण्यात आला आहे. सदर निधीमधून मंजूर रु. १४.५२ लक्ष लेखानुदान आयुक्त, महिला व बाल विकास आयुक्तालय, पुणे यांना वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय:-**

महिला व बाल विकास विभागांतर्गत “सराईत अपराधी व अपराधी परिविक्षा योजना” या योजनेस सन २०२४-२५ या अर्थसंकल्पीय वर्षात मागणी क्र.एक्स-१, २२३५, सामाजिक सुरक्षा व

कल्याण, १०६ सुधार सेवा, (०१) सराईत अपराधी व अपराधी परिवीक्षा योजना, (०१) (०१) सराईत अपराधी व अपराधी परिवीक्षा योजना (कार्यक्रम) (२२३५-०११३) या लेखाशीर्षाखाली ३१ सहाय्यक अनुदाने (वेतनेतर) या उद्दिष्टासाठी अर्थसंकल्पित रु.४४.०० लक्ष निधी एप्रिल २०२४ ते जुलै २०२४ या कालावधीसाठी मंजूर रु. १४.५२ लक्ष लेखानुदान या शासन निर्णयाद्वारे आयुक्त, महिला व बाल विकास आयुक्तालय, पुणे यांना वितरीत करण्यात येत आहे.

२. सदर निधी महाराष्ट्र अर्थसंकल्पीय नियमपुस्तिका व वित्तीय अधिकार नियमपुस्तीकेमध्ये उल्लेख केलेल्या तसेच वित्त विभाग शासन परिपत्रक दि.१ एप्रिल, २०२४ रोजीच्या परिपत्रकात नमूद केलेल्या अटी व शर्तीचे पालन करुन खर्च करण्यात यावा. सदर निधीसाठी नियंत्रक अधिकारी म्हणून आयुक्त, महिला व बाल विकास, पुणे हे राहतील. सदर निधी ज्या प्रयोजनासाठी आहे त्याच प्रयोजनासाठी खर्च होईल याची संबंधितांनी दक्षता घ्यावी.

३. सदर शासन निर्णय नियोजन व वित्त विभागाच्या सहमतीने त्यांच्या अनौपचारीक संदर्भ क्रमांक अनुक्रमे १७३/१४७२, दि.२१/०५/२०२४ व १५२/व्यय-६, दि. ०७/०६/२०२४ अन्वये निर्गमित करण्यात येत आहे.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेत स्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक २०२४०६२०१६०१५९६२३० असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

NEELIMA PRAMOD CHAUDHARI

Digitally signed by NEELIMA PRAMOD CHAUDHARI
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=PLANNING DEPARTMENT, 2.5.4.20=2d492c577d5f8956310c91dc01ffb9a071206c77d27a3be4e52d7c1b29fcf933, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=AA21FB5959CBBFBF3AA97101D99F5D77D2333AE1AC39229E507A3EBF86EC6CD4, cn=NEELIMA PRAMOD CHAUDHARI
Date: 2024.06.20 16:17:12 +05'30'

**( नीलिमा चौधरी )**

**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रत-**

१. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-१ / २, मुंबई / नागपूर.
२. महालेखापाल (लेखा परिक्षा), महाराष्ट्र-१ / २, मुंबई / नागपूर.
३. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
४. निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई.
५. आयुक्त, महिला व बाल विकास आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे.
६. सर्व जिल्हा कोषागार अधिकारी (आयुक्तालयामार्फत)
७. कक्ष अधिकारी (१४७२), नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई.
८. कक्ष अधिकारी (व्यय-६ / अर्थसंकल्प-७), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
९. कक्ष अधिकारी (का-४), महिला व बाल विकास विभाग, मंत्रालय, मुंबई, यांना विनंती करण्यात येते की, सदर निधी आयुक्त, महिला व बाल विकास आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे यांना तात्काळ वितरीत करण्यात यावा.
१०. निवड नस्ती (का-९)